**श्री.यु.एस.इंदलकर, सहनिबंधक, सहकारी संस्था यांच्या पदस्थापनेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राजस-१०१४/प्र.क्र.११९/५-स**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १८ ऑक्टोबर, २०१४

**प्रस्तावना :-**

श्री. यु. एस. इंदलकर यांची शासन निर्णय राजस-१०१३/प्र.क्र. १३५/५-स, दि. २०/०५/२०१३ अन्वये विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर येथून सहनिबंधक तथा कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य मजूर सहकारी संघ, मर्या., पुणे या पदावर प्रतिनियुक्तीने बदली करण्यात आली होती. श्री. इंदलकर हे सदर पदावर दि. ०३/०६/२०१३ पासून कार्यरत होते. मात्र मजूर संघाने श्री. इंदलकर यांना सहनिबंधक तथा कार्यकारी संचालक महाराष्ट्र राज्य मजूर सहकारी संघ, मर्या., पुणे या पदावरुन दि.३१/१२/२०१३ रोजी मध्यान्होतर सेवामुक्त केले त्यामुळे श्री. इंदलकर हे दि. ०१/०१/२०१४ पासून नियुक्तीच्या प्रतिक्षेत विनापद होते. त्यामुळे श्री.इंदलकर यांना सहनिबंधक, सहकारी संस्था या पदावर पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

श्री.यु.एस.इंदलकर, सहनिबंधक, सहकारी संस्था यांना महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ च्या कलम ४(४)(एक) मधील तरतूदीनुसार प्रशासकीय कारणास्तव मुख्य कार्यकारी अधिकारी, मुंबई प्रदेश लोखंड व पोलाद बाजार समिती, कळंबोली, जि.रायगड या रिक्त पदावर पदस्थापना देण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

उपरोक्त अधिकाऱ्यांनी नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे व तसा अहवाल सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०१८११३२५६३४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Pandurang Pandhare

Digitally signed by Sunil Pandurang Pandhare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sunil Pandurang Pandhare
Date: 2014.10.18 11:44:56 +05'30'

**( सुनिल पांढरे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) अध्यक्ष, मुंबई प्रदेश लोखंड व पोलादा बाजार समिती, कळंबोली, जि.रायगड

३) सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन/लेखापरीक्षण), मुंबई
४) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड.
७) संबंधित अधिकारी द्वारा- सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) अपर मुख्य सचिव (पणन)/ अपर मुख्य सचिव (वस्त्रोद्योग)/सचिव (सहकार) यांचे स्वीय सहायक.
९) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय.
१०) निवड नस्ती ५-स कार्यासन